**कोषागारातून रोख देय अनुदान**

**अर्थसंकल्पीय अनुदान २०१०-११**
महाजल कार्यक्रमांतर्गत ग्रामीण पाणी पुरवठा
योजनांच्या देखभाल दुरुस्तीसाठी अनुदाने.
**लेखाशिर्ष (२२१५ २०८२)**

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,

शासन निर्णय क्र. देप्रोअ-१३१० / प्र.क्र. ४० / पापु-०८,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२ दिनांक :- १० मार्च, २०११

संदर्भ : - १) शासन निर्णय क्र. देप्रोअ-१३१०/प्र.क्र.१०४/ पापु-०७, दिनांक २८ एप्रिल, २०१०
२) शासन निर्णय क्र. देप्रोअ-१३१०/प्र.क्र.४०/ पापु-०८, दिनांक १ सप्टेंबर, २०१०
३) शासन निर्णय क्र. देप्रोअ-१३१०/प्र.क्र.४०/ पापु-०८, दिनांक २३ फेब्रुवारी, २०११

**प्रस्तावना :-**

ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीसाठी उपलेखाशिर्ष २२१५ २०८२ खाली आर्थिक वर्ष २००१०-११ मध्ये रु. २२६२.६१ लक्ष इतकी तरतूद मंजूर आहे. या तरतूदीपैकी उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णय क्र. १ अन्वये रू. ७,५६,००,००/- , संदर्भाधीन शासन निण यि क्र. २ अन्वये रू. ३,७५,३०,५००/- व संदर्भाधीन शासन निर्णय क्र. ३ अन्वये रु. ६,२९,१०,१३०/-इतका निधी जिल्हा परिषदांना वितरीत करण्यात आला आहे.

आता माहे मार्च, २०११ करिता वित्त विभागाकडून रु. ५,०२,२०,१७०/- इतका निधी संगणक वितरण प्रणालीद्वारे प्राप्त झाला आहे. सदर निधी माहे, मार्च, २०११ मध्ये कॅश-फ्लो नुसार संगणक वितरण प्रणालीद्वारे जिल्हा परिषदांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार, आर्थिक वर्ष २०१०-११ मध्ये ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीसाठी उपलेखाशिर्ष २२१५ २०८२ खाली उपलब्ध रु. **५,०२,२०,१७०/- (रूपये पाच कोटी दोन लक्ष वीस हजार फक्त)** तरतूद शासन, सोबत जोडलेल्या विवरण पत्रातील स्तंभ क्र. ३ नुसार संबंधित जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांना माहे मार्च, २०११ मधील कॅश-फ्लो नुसार पुढील अटींवर रोख मंजूर व मुक्त करीत आहे.

अ) जिल्हा परिषदांनी हे अनुदान सन- २०१०-११ या आर्थिक वर्षात केवळ ग्रामीण भागातील प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजनांच्या (नियमित, हंगामी व गुरुत्वआधारीत) देखभाल दुरुस्तीसाठी शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांनुसार खर्च करावयाचे आहे.

ब) जिल्हा परिषदांनी या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

क)  वरील अटी/शर्तींची जिल्हा परिषदांकडून पूर्तता होत आहे ह्याची शासनाला खात्री करुन घेता यावी म्हणून महालेखापाल, महाराष्ट्र- १/२, मुंबई / नागपूर यांना तसेच या विभागातील प्राधिकृत केलेल्या अधिका-यास लेखा परिक्षणाकरीता जिल्हा परिषदांची पुस्तके व लेखे पाहण्याचा अधिकार राहील, महालेखापाल यांना त्यांचे काम योग्य त-हेने पार पाडता यावे म्हणून जिल्हा परिषदा संपूर्ण मदत व सुविधा पुरवतील.

ड)  या मंजूर अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे जिल्हा परिषदेने द्यावयाची आहेत. उपयोगिता प्रमाणपत्राच्या प्रती महालेखापाल, महाराष्ट्र , मुबई/ नागपूर आणि अधिदान व लेखा अधिकारी यांना पाठविण्यात याव्यात.

इ)  शासन परिपत्रक ग्राम विकास विभाग क्र. आरसीएन-१०८९/सीआर-३०२७/२८, दि.५.९.१९९० मधील सूचनेप्रमाणे या अनुदांनाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहीत दिनांकाना जिल्हा परिषदांनी विभागीय आयुक्त ( विकास शाखा ) यांना व या विभागातील कार्यासन क्र. पापु-०५, पापु-०८ व पापु- २० ला सादर करावे.

२.  यासाठी होणारा खर्च मागणी क्र. वाय- २, "२२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता-१०२- ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम (०२) (१६) नळाद्वारे पाणी पुरवठा योजना- देखभाल व दुरुस्ती यासाठी अनुदान (२२१५ २०८२) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व त्याखालील मंजूर तरतुदीतून भागवावा.

३.  सदर निधी Cash Flow नुसार मार्च महिन्यात आहरीत करुन घ्यावा.

४.  सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.अनौ १२४/ ११ /अर्थ-१८, दिनांक २३/२/११ अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०३१०१४२०५२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सही/-

**( गौ. सं. पवार )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) विभागीय आयुक्त, सर्व

२) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.

३) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी.
४) सर्व जिल्हा परिषदांचे कार्यकारी अभियंता (ग्रामीण पाणी पुरवठा विभाग)
५) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
६) मुख्य अभियंता, भारत निर्माण कक्ष, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
७) जिल्हा कोषागरे अधिकारी (सर्व)
८) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ ,मुंबई / नागपूर (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता)
९) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई.
१०)मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा , नाशिक, पुणे, अमरावती, औरंगाबाद व नागपूर
११))अधीक्षक अभियंता, विभागीय भारत निर्माण कक्ष (सर्व)
१२)नियोजन / वित्त विभाग (व्यय-३), मंत्रालय, मुंबई
१३)पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासने क्र. पापु-०४, पापु-५, पापु-१० व पापु-२०
१४)निवडनस्ती, पापु-०८

| शा.नि. क्र. देप्रोअ १३१०/प्र.क्र. ४०/ पापु-०८ दिनांकः-१० मार्च,२०११ चे सहपत्र लेखाशीर्ष २२१५ २०८२ खाली ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीसाठी आर्थिक वर्ष २०१०-११ मध्ये वितरीत करावयाचा निधी | | |
|---|---|---|
| | | रु.हजारात |
| अ.क्र. | जिल्हा परिषद | मार्च २०११ मध्ये कॅशफ्लोनुसार वितरीत करावयाचा निधी |
| १ | २ | ३ |
| १ | ठाणे | ९५८ |
| २ | रायगड | १३४२ |
| ३ | रत्नागिरी | ६५५ |
| ४ | सिंधुदुर्ग | ७०२ |
| ५ | नाशिक | ३०१७ |
| ६ | धुळे | १०३५ |
| ७ | नंदूरबार | २४८ |
| ८ | जळगाव | १८९८ |
| ९ | अहमदनगर | ६५०३ |
| १० | पुणे | २१२९ |
| ११ | सातारा | १२९५ |
| १२ | सांगली | ५३७४ |
| १३ | सोलापूर | ३०४३ |
| १४ | कोल्हापूर | १७६५ |
| १५ | औरंगाबाद | १११५ |
| १६ | परभणी | ९०४ |
| १७ | हिंगोली | १२९० |
| १८ | बीड | १११३ |
| १९ | नांदेड | १०१७ |
| २० | उस्मानाबाद | १२५६ |
| २१ | लातूर | २१२८ |
| २२ | बुलढाणा | ७२१ |
| २३ | अकोला | २५६५ |
| २४ | वाशिम | ५७१ |
| २५ | अमरावती | २८८१ |
| २६ | यवतमाळ | ७७९ |
| २७ | वर्धा | १०७९ |
| २८ | नागपूर | २२५ |
| २९ | भंडारा | ३७३ |
| ३० | गोंदिया | १५७९ |
| ३१ | चंद्रपूर | ५७५ |
| ३२ | गडचिरोली | ८५.१७ |
| | **एकूण** | ५०२२०.१७ |

एकूण रु. पाच कोटी दोन लक्ष वीस हजार एकशे सत्तर फक्त

सही/-

( गौ. सं. पवार)

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन